(१४ पैकी शासन निर्णय क्र.३)
**फौजदारी खटल्यातील सिध्दापराध प्रमाण वाढविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत. वरिष्ठ पोलीस अधिका-यांना महत्वाच्या खटल्यामध्ये खाजगी वकील नेमण्याचा अधिकार प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डीपीपी-२०१२/प्र.क्र.१०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, दुसरा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ मे,२०१५

**प्रस्तावना :**

सार्वजनिक हिताच्या दृष्टीने काही संवेदनशील व महत्वाच्या खटल्यामध्ये सरकारची बाजू न्यायालयात मांडण्यासाठी विशिष्ट प्रकारच्या शासकीय अभियोक्त्यांची आवश्यकता असते.अशा प्रकारच्या नियुक्तीकरिता शासनाची मान्यता आवश्यक असल्याने कालापव्यय होवून दोषारोपसिद्धीवर परिणाम होण्याची शक्यता नाकारता येत नाही.सबब, दोषारोपसिद्धीचे प्रमाण वाढविण्याच्या दृष्टीकोनातून अशा महत्वाच्या खटल्यात विशेष सरकारी अभियोक्त्यांची नियुक्ती करण्याचे अधिकार क्षेत्रिय पातळीवर देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सार्वजनिक हिताच्या दृष्टीने काही संवेदनशील व महत्वाच्या खटल्यामध्ये सरकारची बाजू न्यायालयात मांडण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्त्यांची नियुक्ती करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

(अ) पोलीस आयुक्त, विशेष पोलीस महानिरीक्षक व पोलीस अधिक्षक यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रासाठी राज्य शासनाने निश्चित केलेल्या दरावर वकीलांचे पॅनेल तयार करावेत.

(आ) फौजदारी प्रक्रिया संहीता १९७३ च्या कलम २४ (८) प्रमाणे, संवेदनशील व महत्वाचे खटले चालविण्यासाठी सदर पॅनेलमधून वकीलांना विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून पोलीस आयुक्त व पोलीस अधिक्षक यांनी त्यांचे कार्यक्षेत्राकरीता नियुक्त करावे.

२. विशेष सरकारी अभियोक्त्यांची नियुक्ती करताना खटला सार्वजनिक हिताच्या दृष्टीने संवेदनशील व महत्वाचा असल्याची खातरजमा संबधीत प्राधिका-याने करावी व अशा प्रकरणामध्ये दोषारोपसिद्धी होईल याकडे जाणीवपूर्वक लक्ष द्यावे.

३. सदर नियुक्त करण्यात येणा-या विशेष सरकारी अभियोक्त्यांची व्यावसायिक फी शासनाने निश्चित केलेल्या दरानुसार अदा करण्याची कार्यपध्दत पुर्वीप्रमाणेच राहील.

४. महाराष्ट्र विधि अधिकारी (नियुक्ती, सेवाशर्ती व मानधन) नियम-१९८४ Maharashtra Law Officers (Appointment, Condition of Service and Remuneration), Rules, १९८४

व शासकीय विधिविषयक कामकाजाचे नियम, १९८४ (Rules for the conduct of Legal Affairs of Government, १९८४) यामध्ये आवश्यक त्या सुधारणा विधि व न्याय विभागाने तातडीने कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१७१४२०८५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Santaram Patil

Digitally signed by Dattatray Santaram Patil
DN: CN = Dattatray Santaram Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.12 19:11:42 +05'30'

**(द.सं.पाटील)**
उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय मुंबई.

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य

४. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई

५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई

६. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय मुंबई.

७. प्रधान सचिव व विधी परामर्श, विधी व न्याय विभाग मंत्रालय, मुंबई

८. प्रधान सचिव, विशेष, मंत्रालय, मुंबई

९. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई

१०. सर्व पोलीस आयुक्त

११. विशेष पोलीस महानिरीक्षक, सर्व परिक्षेत्र

१२. सर्व अपर पोलीस महासंचालक

१३. सर्व जिल्हाधिकारी

१४. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश

१५. सर्व पोलीस अधीक्षक

१६. संचालक, अभियोग, संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१७. मा.राज्यमंत्री (शहरे) यांचे खाजगी सचिव

१८. मा.राज्यमंत्री (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव

१९. उप सचिव (पोल-१०)

२०. सर्व सह सचिव/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

२१. सर्व कार्यासने, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

२२. निवडनस्ती